केंद्रीय जलआयोगाच्या व नियोजन आयोगाच्या मार्गदर्शक तत्वानुसार धोम बलकवडी व तारळी प्रकल्पांच्या वाढीव किंमतीबाबतचे समर्थन देण्यासाठी संनियंत्रण समिती गठित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्रमांकः धोमब-०३०९/(१२४/०९)/मोप्र-१
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२,
दिनांकः- १७ जून २००९

**प्रस्तावना :-**

धोम बलकवडी सिंचन प्रकल्पाचे रक्कम रु.४७५.२९ कोटी (सन २००० चे मूल्य पातळी नुसार) चे प्रस्तावास केंद्रीय जल आयोग, नवी दिल्ली यांनी दिनांक १९.०२.२००४ रोजीचे ८२ व्या बैठकीमध्ये मान्यता दिलेली आहे. सन २००७-०८ चे मूल्य पातळी (Price Level) नुसार धोम बलकवडी प्रकल्पाची सुधारित किंमत रु.६८४.६४ कोटी इतकी येत आहे.

तारळी सिंचन प्रकल्पाच्या रक्कम रु.५०४.९६ कोटी (२०००-०१ मूल्य पातळी) च्या प्रस्तावास केंद्रीय जल आयोग, नवी दिल्ली यांनी दि.४.८.२००३ रोजीचे ८१ व्या बैठकीत मान्यता दिली आहे. सन २००७-०८ चे मुल्य पातळी नुसार प्रकल्पाची सुधारित किंमत रु. ९५४.०१ कोटी इतकी येत आहे.

धोम बलकवडी प्रकल्प व तारळी प्रकल्पाचा समावेश केंद्र शासनाच्या वेगवर्धीत सिंचनलाभ कार्यक्रमात (A.I.B.P.) सन-२००७-०८ पासून करण्यात आला असुन त्यानुसार मार्च २०११ अखेर सदर प्रकल्प पुर्ण करण्याचे नियोजीत आहे. त्यामुळे या दोन्ही प्रकल्पाच्या सुधारीत अंदाजपत्रकीय रक्कमेस केद्रीय जल आयोग व नियोजन आयोगाची मान्यता घेणे क्रमप्राप्त आहे.

केंद्रीय जल आयोगाचे मार्गदर्शक तत्वानुसार प्रकल्पाचे वाढीव किंमतीचे समर्थन देण्यासाठी अपर मुख्य सचिव (वित्त) व अपर मुख्य सचिव (नियोजन) आणि सचिव (जलसंपदा) सदस्य असलेली एक समिती गठित करण्याचे सूचीत करण्यात आले आहे. त्यानुसार, अशी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करुन, केंद्रीय जल आयोग, नवी दिल्ली यांचे मार्गदर्शक तत्वातील सूचनेनुसार धोम बलकवडी व तारळी सिंचन प्रकल्पांच्या सुधारित प्रकल्प अहवालानुसारचे वाढीव किंमतीबाबतचे समर्थन देण्यासाठी पुढील प्रमाणे संनियंत्रण समिती गठित करण्यास शासन मान्यता देत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | प्रधान सचिव, (वित्त) वित्त विभाग | - | अध्यक्ष |
| २) | प्रधान सचिव (नियोजन) नियोजन विभाग | - | सदस्य |
| ३) | सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग | - | सदस्य |
| ४) | मुख्य अभियंता (जसं) व सहसचिव | - | सदस्य सचिव |

(कृ.मा.प.)

२.	समितीने प्रकल्पांच्या सुधारित प्रकल्प अहवालानुसारचे वाढीव रक्कमेचा आढावा घेऊन किंमतीतील वाढीची कारणे व त्याबाबतच्या शिफारशींसह शासनास अहवाल सादर करावा.

३.	सदर शासन निर्णय महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९०६१७१६०१०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने.

(र.श्री. कळसकर)
शासनाचे अवर सचिव

प्रति :

मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.प्रधान सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.प्रधान सचिव (नियोजन) नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई
मा.सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई
मा.सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.